**महाराष्ट्रातील रेशीम उद्योग प्रकल्पाचे रिमोट सेन्सिंगद्वारे छायाचित्र घेण्यासाठी मोबाईल ॲप्लीकेशन विकसित करणे व यासाठी रु.१८.०३ लक्ष इतकी रक्कम रेशीम संचालनालयास अदा करण्यास मान्यता देणे.**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांकः सववि-३५१५/प्र.क्र.२८३/आस्था-१,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: ३१ जुलै, २०१५

**संदर्भ :**

१) रेशीम संचालनालय, नागपूर यांचे पत्र जावक क्र.रेशीम/कार्या-१०/रि.सि.ॲप/ १५-१६/४११, दि.१७/६/२०१५,

२) वस्त्रोद्योग विभागाच्या रेशीम कक्षाची दि.२९ जून, २०१५ ची टिप्पणी.

**प्रस्तावना :**

राज्यातील रेशीम उद्योग विस्तार व विकास कार्यक्रमांतर्गत क्षेत्रीय कर्मचाऱ्यांच्या कामकाजात गतीमानता, पारदर्शकता व अचूकता यावी म्हणून शेतकऱ्यांच्या प्रत्यक्ष क्षेत्रावर जाऊन तुती बागेचे, संगोपनगृहाचे छायाचित्र घेण्यासाठी MRSAC या संस्थेमार्फत मोबाईल ॲप्लीकेशन विकसीत करण्याचे शासनाचे विचाराधीन आहे. त्यासाठी अधिकारी/कर्मचाऱ्यांना ३ G इंटरनेट पॅकसाठी रु.१५०/- प्रती महिना प्रती कर्मचारी आवश्यक असून १५२ क्षेत्रीय अधिकारी/ कर्मचारी यांना एकूण रु.१.३७ लक्ष प्रती वर्ष खर्च अपेक्षित आहे. तसेच सदर मोबाईल ॲप्लीकेशन MRSAC या शासनाच्या स्वायत्त संस्थेमार्फत विकसित करण्यासाठी रु.१६.६६ लक्ष असे एकूण रु.१८.०३ लक्ष इतक्या रकमेची तरतूद रेशीम संचालनालयास उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.

**ज्ञापन :**

महाराष्ट्रातील रेशीम उद्योग प्रकल्पाचे रिमोट सेन्सिगद्वारे छायाचित्र घेण्यासाठी महाराष्ट्र रिमोट सेंस्निंग ॲप्लीकेशन सेंटर (MRSAC), नागपूर या शासनाच्या स्वायत्त संस्थेमार्फत मोबाईल ॲप्लीकेशन विकसीत करण्याकरिता व त्यासाठी असणाऱ्या ३G इंटरनेट पॅककरिता सन २०१५-१६ या वर्षासाठी रु.१८.०३ लक्ष (अक्षरी रुपये अठरा लक्ष तीन हजार फक्त) इतकी रक्कम रेशीम संचालनालयास अदा करण्यास या ज्ञापनान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. वरील रक्कम BDS प्रणालीद्वारे रेशील संचालनालय, नागपूर यांस अदा करण्यात यावी.

३. सदर खर्च मागणी क्रमांक "व्ही-**२, ३४५१** सचिवालयीन - आर्थिक सेवा **(००) (९०)** सचिवालयीन, **(०२)** पंचवार्षिक योजनांतर्गत योजना **(०२) (०४)** ई गव्हर्नस कार्यक्रम (वस्त्रोद्योग)

**(३४५१२९७१)** (योजनांतर्गत)**, १७** संगणक खर्च" या लेखाशीर्षाखाली सन **२०१५-२०१६** या वित्तीय वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. या शासन ज्ञापनान्वये मंजूर करण्यात आलेल्या रक्कमेचे आहरण करुन संबंधिताना वितरीत करण्याकरीता **श्रीमती सीमा वासुदेवराव नन्होरे, लेखाधिकारी, रेशीम संचालनालय, नागपूर** यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. **श्री. एन.पी. एगलेवाड, संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांना** नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन ज्ञापनान्वये मंजूर केलेली रक्कम आहरीत करुन संबंधिताना वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी यांनी करावी. **सदर रक्कम ज्या उद्देशासाठी अदा करण्यात येत आहे, त्याच उद्देशासाठी वापरण्यात यावी.**

५. सदर ज्ञापन शासन निर्णय वित्त विभाग, क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/२/२००९ चे परिशिष्टामध्ये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-पहिला उपविभाग-तीनच्या अनुक्रमांक चार परिच्छेद क्र.२७(२) नुसार विभागास प्राप्त असलेल्या अधिकारानुसार व विभागाच्या ई-गव्हर्नन्स योजनेच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७३११२२२०६०२०२ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Baburao Tumbare

Digitally signed by Sunil Baburao Tumbare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Corporation marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sunil Baburao Tumbare
Date: 2015.07.31 12:25:16 +05'30'

**( सु. बा. तुंबारे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१) महालेखापाल (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/ नागपूर

२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागपूर

३) संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर

४) अपर मुख्य सचिव (पणन), यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

५) अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग), यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

६) प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

७) सह सचिव, (आस्था), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

८) उप सचिव, (रेशीम), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

९) कक्ष अधिकारी, टेक्स-५, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), स.प.व व. विभाग, मंत्रालय, मुंबई

१०) कक्ष अधिकारी (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

११) कक्ष अधिकारी, वित्त विभाग, व्यय-२/ वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई

१२) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, का-१४३१, मंत्रालय, मुंबई

१३) राज्य सूचना विज्ञान अधिकारी, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, म.रा., ११, वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई

१४) निवड नस्ती / आस्था-१ संग्रहार्थ.